**मेडीगड्डा येथील आंतरराज्य प्रकल्पातील बॅरेजमुळे महाराष्ट्राची जमिन संपादीत झाल्यामुळे उद्भवलेल्या अडचणी संदर्भात चौकशी समिती नेमण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - २०१३/प्र.क्र. ८७/२०१३/जसंनि**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १२/०६/२०२०

**प्रस्तावना -**

मेडीगड्डा बॅरेज या महाराष्ट्र व तेलंगणा यांच्या सरहद्दीवरील प्रकल्पामुळे क्षेत्र बाधीत झाले आहे. यामुळे स्थानिक लोकांना मोठ्या प्रमाणात अडचणी निर्माण झाल्याची बाब राज्य मंत्रीमंडळाच्या दि. १९/०२/२०२० च्या बैठकीत चर्चेसाठी आली होती. त्यातील निर्देशानुसार मेडीगड्डा येथील आंतरराज्य प्रकल्पातील बॅरेजमुळे महाराष्ट्राची जमिन  बुडीताखाली गेल्याने व संपादीत झाल्यामुळे उद्भवलेल्या अडचणी संदर्भात आढावा घेऊन उपाययोजना सुचविणेसाठी चौकशी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मेडीगड्डा येथील आंतरराज्य प्रकल्पातील बॅरेजमुळे महाराष्ट्राची जमिन बुडीताखाली गेल्याने व संपादीत झाल्यामुळे उद्भवलेल्या अडचणी संदर्भात चौकशी करण्यासाठी पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

**अ) चौकशी समितीची रचना :**

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | विभागीय आयुक्त,नागपूर विभाग, नागपूर. | अध्यक्ष |
| २ | जिल्हाधिकारी, गडचिरोली जिल्हा, गडचिरोली. | सदस्य |
| ३ | जिल्हाधिकारी, गोंदिया जिल्हा,  गोंदिया. | सदस्य |
| ४ | मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, नागपूर. | सदस्य |
| ५ | अधीक्षक अभियंता, पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण मंडळ, नागपूर. | सदस्य |
| ६ | अधीक्षक अभियंता, चंद्रपूर पाटबंधारे प्रकल्प मंडळ, चंद्रपूर. | सदस्य सचिव |

**ब) चौकशी समितीची कार्यकक्षा (Term of Reference) -**

१. महाराष्ट्र व तेलंगणा राज्यात झालेल्या आंतरराज्य करारा मधील तरतूदींचा भंग झालेला आहे का ?

२. मेडीगड्डा बॅरेज आंतरराज्य करारानुसार ठरविण्यात आलेल्या उंची नुसार गट नं/सर्व्हे. नं. निहाय बुडीताखाली येणारे क्षेत्र. तसेच उंची वाढ केल्यानंतर गट नं/सर्व्हे.नं. निहाय बुडीताखाली येणारे क्षेत्र. या क्षेत्रांची आंतरराज्य करारानुसार ठरविण्यात आलेल्या क्षेत्राशी तुलनात्मक स्थिती व सर्वेक्षण नकाशे तयार करणे.

३. मेडीगड्डा बॅरेजच्या बुडीताखाली येणारे मुख्य नदी, उपनदी व नाले ओढे यांच्या लगतचे क्षेत्र निश्चित करणे. तसेच तेथील बुडीत होणारे कालवे, पूल, बांधकाम यांची सविस्तर माहिती निश्चीत करणे व उपाययोजना सुचविणे.

४. महाराष्ट्रातील भूसंपादन तेलंगणा राज्याने करुन तेलंगणा राज्याचे नाव महसूली भूमीलेखात नोंदवले बाबतची माहिती. इतर आंतरराज्य प्रकल्प लेंडी, बाभळी इ. बाबत काय पध्दती अवलंबलेली आहे ?

५. महाराष्ट्रातील जमीन तेलंगणा राज्याने संपादीत करुन त्यांचे नाव महसूली भूमीलेख (७/१२ नमूना) यावर नोंदविली असल्यास त्यात दुरुस्ती करण्यासाठीची कार्यपध्दती.

६. सिरोंचा व इतर भागातील शेतकऱ्यांच्या शेतात पाणी जाऊन नुकसान झाले आहे. त्या नुकसानीची भरपाई तेलंगणा शासनासोबत झालेल्या करारनाम्याची तपासणी करुन कार्यवाही व पत्रव्यवहार करणे.

७. ह्या प्रकल्पात किती जंगल बुडणार हे स्थानिक वनपरिक्षेत्र कार्यालयाकडून तपासणी होऊन सविस्तर परिस्थितीचा अहवाल मंत्रालयात पाठविल्यानंतर मंत्रालयातून कुठलेही जंगल बुडत नाही असे ना-हरकत प्रमाणपत्र देणे अपेक्षित होते, मात्र तसे झाल्याचे दिसून येत नाही. तरी याबाबतची चौकशी करणे.

८. आंतरराज्यीय करार होत असतांना तेलंगणाने बांधकामाची जी परिस्थिती सांगितली त्यापेक्षा वेगळ्या पध्दतीने बांधकाम केल्याची शक्यता आहे. तसेच बुडणारे वनक्षेत्र किती असेल त्याची तपासणी करणे आवश्यक आहे. तसेच वनविभागाकडून जे प्रमाणपत्र देण्यात आले, ते शासकीय निकषानुसार देण्यात आले का नाही तर कुणाच्या दबावात हे प्रमाणपत्र देण्यात आले, याची चौकशी होणे आवश्यक आहे. बांधकाम होत असतांना स्थानिक उपवनसंरक्षक कार्यालयाने काही बाबींवर आक्षेप घेतला होता, मात्र त्यांना तत्कालीन जिल्ह्याधिकाऱ्यांनी कार्यवाही न करण्याची सूचना केली यात कुणाचा दबाव होता याबाबतची चौकशी करणे.

**क) चौकशी समितीचा कालावधी :**

सदर समितीने कार्यकक्षा (Term Of Reference) च्या अनुषंगाने चौकशी करुन त्याबाबत १ महिन्याच्या आत आपला अहवाल शासनास सादर करावा.

**ड) इतर बाबी :**

१. समितीच्या कामकाजासाठी दुरध्वनी, फॅक्स, झेरॉक्स, टंकलेखन, सहाय्यक, क्षेत्रिय सर्वेक्षण इ. व्यवस्था सदस्य सचिव यांनी करावयाची आहे.

२. समितीचे सदस्य उपरोक्त कार्यवाहीसाठी तेलंगणा राज्यात जाऊन माहिती घेणे व अधिकाऱ्यांशी चर्चा करणे या बाबी करु शकतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००६१२१३२६०२४५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunita Virandra Gaikwad

Digitally signed by Sunita Virandra Gaikwad
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=31068f7138cec5cfd3f7311fdd98ec345b9dcaeaab398c726c76f953f0e37af5, serialNumber=7b3d0ddae7b5f68c71f56026f5d7eb976a590fff12e613dac6fd709b6c801646, cn=Sunita Virandra Gaikwad
Date: 2020.06.12 13:33:24 +05'30'

**( सुनिता गायकवाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. मंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. राज्यमंत्री, जलसंपदा , मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२.
६. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
७. अप्पर मुख्य सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. प्रधान सचिव, (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. प्रधान सचिव, (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१४. विभागीय आयुक्त , नागपूर विभाग, नागपूर.
१५. सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१६. मुख्य अभियंता (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

१७. सर्व मुख्य अभियंता (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१८. मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, नागपूर.
१९. मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, अमरावती.
२०. मुख्य संवर्धन, वन विभाग, नागपूर.
२१. जिल्हाधिकारी , गडचिरोली जिल्हा, गडचिरोली.
२२. जिल्हाधिकारी , गोदिंया जिल्हा, गोदिंया.
२३. अधीक्षक अभियंता, पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण मंडळ, नागपूर.
२४. अधीक्षक अभियंता, चंद्रपूर पाटबंधारे प्रकल्प मंडळ, चंद्रपूर.
२५. अधीक्षक अभियंता, यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ.
२६. कार्यासन (जसंनि) संग्रहार्थ.